महाराष्ट्र राज्य सिंधी साहित्य अकादमीच्या पुस्तक प्रकाशन अनुदान योजनेस पात्र नावास आणि अनुदान रकमेस वित्तीय मान्यता मिळणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्र. सिंसाअ ७२२४(११)/प्र.क्र.१८४/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २६ जूलै, २०२४

संदर्भ :-१) शासन निर्णय क्र. सिंसाअ ७२१५ (१४) /प्र.क्र.२३१/सां.का.४, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, दि. १ एप्रिल, २०१६.
२) सहसंचालक, महाराष्ट्र राज्य सिंधी साहित्य अकादमीचे यांचे पत्र क्र. मरासिंसाअ/८३३-८३४/२०२४, दि. २९ जुन, २०२४

**प्रस्तावना :**

राज्यामध्ये सिंधी भाषा आणि साहित्याच्या विकासासाठी महाराष्ट्र राज्य सिंधी साहित्य अकादमी कार्यरत असून या अकादमीद्वारे राज्यात सिंधी भाषा आणि साहित्याचे संवर्धन आणि विकास या संबंधी विविध उपक्रम राबविण्यात येतात. उपर्निर्दिष्ट क्र.१ अन्वये महाराष्ट्र राज्य सिंधी साहित्य अकादमीच्या योजनांची नियमावली निश्चित करण्यात आलेली आहे. त्याअनुषंगाने अकादमीकडून विविध योजना कार्यान्वित करण्यात आल्या आहेत. यातीलच पुस्तक प्रकाशन अनुदान एक महत्वाची योजनेतील पात्र नावास आणि अनुदान रकमेस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

महाराष्ट्र राज्य सिंधी साहित्य अकादमीच्या पुस्तक प्रकाशन अनुदान योजनेतील पात्र नावास आणि अनुदान रु. ८०,०००/- इतक्या रकमेस खालील तपशीलानुसार या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | लेखकाचे नाव | पुस्तकाचे नाव | अनुदान रक्कम |
|---|---|---|---|
| १. | श्रीमती. प्रिया सितपाल | सत साल - कहानीसंग्रह | २०,०००/- |
| २. | श्री. किशोर लालवाणी | चुहडमल एंड सन्स- हास्य नाटक | २०,०००/- |
| ३. | अंजली सुनिल हर्यानी | बर्फिली छांह - कहानी | २०,०००/- |
| ४. | श्री. जीवत केसवानी | बोमदिला (मुळ लेखक- डॉ अविनाश बिनीवाले) (मराठी ते सिंधी अनुवाद श्री जीवत केसवानी) | २०,०००/- |
| | | **एकूण** | **८०,०००/-** |

०२. सदर खर्च लेखाशीर्ष मागणी क्र. झेडडी-२ प्रधान लेखाशीर्ष २२०५, कला व संस्कृतीचे यांचे प्रचालन (०९)सिंधी साहित्य अकादमी (०९) (०१) सिंधी साहित्य अकादमीची आस्थापना (कार्यक्रम), ( २२०५ १६९७ ) ३१ - सहाय्यक अनुदाने ( वेतनेतर ) या लेखा

शीर्षाखालील सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून मंजूर करण्यात येत आहे. सदर अनुदान खर्च झाल्यानंतर उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त होणार असल्याने सदर अनुदान "सशर्त" मंजूर करण्यात येत आहे.

०३. यासाठी, सह संचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी यांना नियंत्रण अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४ सदर खर्चास वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/विनिमय, भाग-२, दि.१७ एप्रिल, २०१५, उपविभाग ३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७(२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मान्यता देण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५ जुलै, २०२४ मधील सर्व परिच्छेद परीशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी सहसंचालक तथा सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य गुजराती साहित्य अकादमी, मुंबई यांची राहील.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०७२६१७३०२०५६२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

GOPICHAND PANDURANG CHAVAN

Digitally signed by GOPICHAND PANDURANG CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT, 2.5.4.20=2f36b6412b2bad225b8d078a7f80eed5b7d004f917946ac3d5ff416ac9473d48, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0E195B995C4CFBA1B7E199D1B4B48F8A7C4C1AAD3E82FED8E020632824893159, cn=GOPICHAND PANDURANG CHAVAN
Date: 2024.07.26 17:44:46 +05'30'

**( गोपिचंद पां. चव्हाण )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.मा. मंत्री ( सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. उप सचिव ( सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४. सह संचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, ओल्ड कस्टम हाऊस, विकास विभाग इमारत, शहिद भगतसिंग मार्ग, मुंबई ४०० ००१.
५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र, मुंबई
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २ महाराष्ट्र, नागपूर
१२.निवड नस्ती, सां.का.४.